DA23 HARSHA\2003\BUD 1\KALE\LETTERS\VIKASU 2403-KA.SU.-CR 2

अर्थसंकल्पीय विशेष बाबींवर त्वरीत कार्यवाही करणेबाबत....

# महाराष्ट्र शासन
# गृह विभाग

शासन परिपत्रक क्र.विकसू ०१०३/क.सू./प्र.क्र.-२/बीयुडी-१
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दिनांक : २४ जुलै , २००३

<u>शासन परिपत्रक :-</u>

अर्थसंकल्पीय विषयक बाबी विशेषतः अर्थसंकल्पीय अंदाज, पुरवणी मागण्या, केंद्र पुरस्कृत योजना, वित्त आयोग , कपात सूचना यासंदर्भात कालमर्यादेत कार्यवाही करणे आवश्यक असते. त्यामुळे याबाबत गृह विभागातील अर्थसंकल्पीय शाखेने माहिती मागविल्यानंतर ती त्यांना विहीत कालमर्यादेत देणे आवश्यक असते. तथापि याबाबत वारंवार पाठपुरावा करुनही अशी माहिती वेळेवर गृह विभागातील कार्यासनांनी न दिल्याने अडचणीची परिस्थिती निर्माण झाल्याचे निदर्शनास आले आहे.

२. सन २००३-२००४ च्या अर्थसंकल्पीय मागण्यांवरील एकूण १९८ कपात सूचना गृह विभागाशी संबंधित आहेत. या कपात सूचनांना अधिवेशन संस्थगित झाल्याच्या दिनांकापासून ६० दिवसांच्या आत ही कपात सूचना मांडणाऱ्या सन्माननीय सदस्यांना उत्तर देणे आवश्यक असते. तथापि, असे असूनही यापैकी फार थोडया कपात सूचनांना उत्तरे पाठविण्यात आल्याचे निदर्शनास आले आहे. यासदर्भात अर्थसंकल्प शाखेच्या पर्यवेक्षकीय अधिकाऱ्यांनी या कपात सूचनांचा त्वरेने निपटारा करण्यासंदर्भात बोलाविलेल्या बैठकीस गृह विभागातील पर्यवेक्षकीय अधिकाऱ्यांनी उपस्थित राहण्याबाबत अनास्था दर्शविल्याचे निदर्शनास आले आहे.

३. वरील परिस्थितीत गृह विभागातील सर्व पर्यवेक्षकीय अधिकाऱ्यांना कळविण्यात येते की, अर्थसंकल्प विषयक बाबींवर गंभीरतेने प्राथम्याने कार्यवाही करावी. विशेषतः कपात सूचना अर्थसंकल्पीय अंदाज , पुरवण्या मागण्या, लेखा आक्षेप, केंद्र पुरस्कृत योजना, वित्त आयोगाला द्यावयाची माहिती याबाबत प्राथम्य क्रमाने कार्यवाही करावी. याबाबत टाळाटाळ केल्याची बाब भविष्यात निदर्शनास आल्यास संबंधितांवर कार्यवाही केली जाईल याची विभागातील सर्व पर्यवेक्षकीय अधिकारी/ कार्यासन अधिकारी यांनी नोंद घ्यावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

( यु. के. मुखोपाध्याय )
अपर मुख्य सचिव (गृह), महाराष्ट्र शासन

प्रती,
अ.मु.स. (गृह) यांचे स्वीय सहाय्यक, गृह विभाग
प्रधान सचिव ( अ.व सु.), यांचे स्वीय सहाय्यक, गृह विभाग
प्रधान सचिव (विशेष), यांचे स्वीय सहाय्यक, गृह विभाग
प्रधान सचिव (परिवहन), यांचे स्वीय सहाय्यक, गृह विभाग
प्रधान सचिव (पर्यटन), यांचे स्वीय सहाय्यक, गृह विभाग
सर्व सहसचिव/ उप सचिव गृह विभाग
सर्व अवर सचिव/ कार्यासन अधिकारी, गृह विभाग